**अपंग व्यक्ती अधिनियम १९९५ मधील तरतुदीनुसार अपंग व्यक्तीना शासकीय / निमशासकीय सेवेत आरक्षण देऊन पदे भरणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,

शासन परिपत्रक क्रमांक :- न्यायाप्र- २०११/ प्र.क्र. ४ / सुधार -३

मंत्रालय विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२

दिनांक :- **२७ एप्रिल, २०११.**

**वाचा:-** १) अपंग व्यक्ती (समान संधी, हक्कांचे संरक्षण व संपूर्ण सहभाग)

२) शासन परिपत्रक,सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र. न्यायाप्र -०६/ प्र.क्र. ९ / सुधार -३, दिनांक २७ फेब्रुवारी, २००९.

३) शासन निर्णय क्रमांक :- अपंग- २०१०/ प्र.क्र. १९४ / सुधार -३ दिनांक :- १७ मार्च, २०११.

**परिपत्रक :-**

अपंग व्यक्ती (समान संधी, हक्कांचे संरक्षण व संपूर्ण सहभाग) अधिनियम १९९५ मधील कलम ३२ नुसार शासकीय व निमशासकीय सेवेत अपंग व्यक्तींसाठी ३ टक्के एवढे आरक्षण ठेवणे आवश्यक आहे. सदर अधिनियमातील कलम ३३ नुसार शासकीय व निमशासकीय आस्थापनेवरील अपंग व्यक्तींसाठी पदे सुनिश्चित करुन ती भरणे आवश्यक आहे. या व अन्य बाबींसाठी मा. उच्च न्यायालय, मुंबई येथील जनहित याचिका क्र. १३९ /२००६, ५४/२००७, ७०/२००२, ७५/२००६, १२९/२००३ अशा वेगवेगळया जनहित याचिका दाखल झाल्या होत्या. या जनहित याचिकांवर वेळोवेळी सुनावणी होऊन, दिनांक १२.२.२००९ रोजी मा. उच्च न्यायालयाने दिलेल्या आदेशाच्या अनुषंगाने अपंगासाठी संवर्गनिहाय संख्या निश्चित करणे, पदनिश्चिती करणे, संवर्गनिहाय एकूण संख्येप्रमाणे अपंगासाठी ३ टक्के आरक्षण निश्चित करणे, विभागनिहाय अपंगाचे अनुशेष त्वरित भरण्यासाठी नियुक्ती प्राधिकरणाने नियुक्ती करणे इ. सूचना शासन परिपत्रक दिनांक २७ फेब्रुवारी, २००९ नुसार दिलेल्या आहेत. परंतु त्याप्रमाणे कार्यवाही होत नसल्याची बाब मा. उच्च न्यायालयाच्या निदर्शनास आणण्यात आलेली आहे.

२. सद्य:स्थितीत अपंगासाठी आरक्षित असलेल्या पदांवर योग्यरित्या व पात्र अपंग उमेदवारांची नियुक्ती करण्यात येत नाही अशा व अन्य मुद्दयांबाबत मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे जनहित याचिका क्र.७०/२००२, ७५/२००६, १२९/२००३, १३९/२००६, ५४/२००७, २२५/२००९, ४४/२००९,११८/२०१० आणि रिट याचिका ३२९४/२०१० दाखल करण्यात आलेल्या आहेत. सदरहू जनहित /रिट याचिकांवर दिनांक १८.३.२०११ रोजी झालेल्या सुनावणीत याचिकाकर्त्यांनी अपंग व्यक्ती अधिनियम १९९५ मधील कलम ३२ व ३३ चा उल्लेख करुन अपंगासाठी अधिनियमानुसार विहित करण्यात आलेले ३ टक्के आरक्षण हे एकूण संवर्ग संख्येस न लावता दिनांक ७ फेब्रुवारी, १९९६ पासून उपलब्ध झालेल्या रिक्त पदांवर गणना केली जाते ही बाब अधिनियमाच्या विरुध्द आहे, असे नमूद केलेले आहे. तसेच या संदर्भात मा. सर्वोच्च न्यायालयाने दिलेले

निकालही मा. उच्च न्यायालयाच्या निदर्शनास आणून दिलेले आहेत. सर्वसाधारण पद भरतीसाठी जाहीरात देताना अपंगासाठी आरक्षित असलेली पदे स्वतंत्रपणे नमूद न करता अपंगाना प्राधान्य देण्यात येईल अशा प्रकारची जाहीरात प्रसिध्द करण्यात येते अशीही बाब मा. उच्च न्यायालयाच्या निदर्शनास आणण्यात आलेली आहे. यावर शासनाकडून मा. उच्च न्यायालयास खुलासा करावयाचा आहे. या संदर्भात अपंग व्यक्तींच्या पद भरतीबाबत सविस्तर सूचना या विभागाच्या दिनांक २७ फेब्रुवारी, २००९ च्या परिपत्रकान्वये देण्यात आलेल्या आहेत.

३. वरील सर्व बाबी विचारात घेऊन, शासन आता संवर्गनिहाय आरक्षण ठेवण्याबाबत पुन्हा खालीलप्रमाणे सूचना देत आहे :-

१) शासन सेवेतील तसेच महामंडळे /मंडळे / राज्य स्वायत्त संस्था व अन्य अनुदानित संस्थांमध्ये अपंगासाठी संवर्गनिहाय पदांची संख्या निश्चित करावी.

२) या विभागाच्या दि.१७ मार्च,२०११ अन्वये अपंगासाठी संवर्गनिहाय पद निश्चिती करावी ( अंध/ क्षीणदृष्टी, अस्थीव्यंग, मूकबधिर )

३) अपंगांचे आरक्षण रिक्त पदावर निश्चित न करता संवर्गनिहाय मंजुर पद संख्येप्रमाणे अपंगासाठी ३ टक्के आरक्षण निश्चित करावे.

४) सध्य:स्थितीतील संवर्गनिहाय असलेली अपंगाच्या अनुशेषाची पदे दिनांक ३० जून, २०११ पर्यंत भरण्याची कार्यवाही करण्यात यावी.

५) पद भरतीसाठीची जाहीरात प्रसिध्द करताना अपंगासाठी आरक्षित असलेली पदसंख्या प्रवर्गनिहाय (अंध/ क्षीणदृष्टी , मूकबधिर व अस्थिव्यंग) अशी स्वतंत्रपणे दर्शवावी.

४. सदर शासन निर्णय संबंधित मंत्रालयीन विभागाने आपल्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख, प्रादेशिक विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख तसेच महामंडळे, नगरपालिका, महानगरपालिका, जिल्हा परिषदा, मंडळे, सार्वजनिक उपक्रम इ. तातडीने पाठवावा व त्याप्रमाणे विहित मुदतीत कार्यवाही करण्याच्या सूचना त्यांना द्याव्यात, असेही आदेश देण्यात येत आहेत.

५. वरीलप्रमाणे करण्यात आलेली कार्यवाही ही दिनांक ३० जून, २०११ पर्यंत कोणत्याही परिस्थितीत पूर्ण करावी व तसा अहवाल सामाजिक न्याय व विशेष सहाय विभागास सादर करावा.

सदरहू शासन निर्णय शासनाच्या वेब साईटवर टाकरण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेताक क्र. **२०११०४२७१९१५२९००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

**( ज. न. राठोड )**

**सह सचिव,महाराष्ट्र शासन.**

प्रति :-

मा. राज्यपालांचे सचिव.

G R.-2011-su-3 43 C:\Documents and Settings\admin\Desktop

मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
मा. मंत्री (सा.न्या) यांचे खाजगी सचिव
मा. राज्यमंत्री (सा.न्या) यांचे खाजगी सचिव
सर्व अप्पर मुख्य सचिव /प्रधान सचिव / सचिव मंत्रालयीन प्रशासकीय विभाग, मंत्रालय, मुंबई
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई (प्रसिध्दीसाठी)
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, बँक ऑफ इंडिया बिल्डींग,हुतात्मा चौक,मुंबई (पत्राने )
सर्व विभागीय आयुक्त
आयुक्त,अपंगकल्याण, महाराष्ट्र राज्य,पुणे
संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य,पुणे
संचालक, वि.जा.भ.ज. व इ.मा.व. संचालनालय,पुणे
सर्व जिल्हाधिकारी
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
सर्व विभागीय समाजकल्याण अधिकारी
सर्व विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी
सर्व समाजकल्याण अधिकारी,जि.प.
विभागातील सर्व कार्यासने
निवड नस्ती-सुधार-३.